संतपीठ, पैठणचे शैक्षणिक व्यवस्थापन डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाकडे सोपविण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्र. संतपी-२०२०/प्र.क्र.९८/विशि-२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ सप्टेंबर, २०२१.

वाचा :- १) समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र.संतपी-०५९२/प्र.क्र.१७७/सां.का.२, दि.०६.१२.१९९४.

२) समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र.संतपी-२०००/प्र.क्र.२१/सां.का..२, दि.१८.०१.२००१.

३) संचालक, उच्च शिक्षण यांचे दि.०९.०२.२०२१ रोजीचे पत्र.

प्रस्तावना :-

मराठवाडा विकासाच्या ४२ कलमी कार्यक्रमातंर्गत पैठण जि.औरंगाबाद येथे संतपीठ स्थापन करण्यास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. सदर संतपीठाचे पंजीकरण मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अधिनियम क्र.२९ अन्वये दि.१७.०१.१९९९ रोजी झाले आहे. संतपीठासाठी श्री.ज्ञानेश्वर उद्यान परिसर, पैठण येथील १७.८ एकर जमीन संपादित करण्यात आली आहे. सदर जमीन जायकवाडी पक्षी अभयारण्यातून महसूल व वन विभागाच्या दि.२८.११.२०१३ च्या अधिसूचनेद्वारे विमुक्त करण्यात आली आहे. सदर संतपीठ सुरु करण्यासाठी संतपीठाची प्रशासकीय इमारत, वसतीगृह, वाचनालय इत्यादी वास्तु उभारण्यासाठी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये रु.६ कोटीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार संतपीठाची प्रशासकीय इमारत व दोन वसतिगृह सार्वजनिक बांधकाम विभाग औरंगाबाद यांच्यामार्फत बांधून तयार आहेत. तद्नंतर दि.०६.०४.२०१७ रोजी मंत्रिमंडळ बैठकीत संतपीठ हा विषय सांस्कृतिक कार्य विभागाकडून उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडे हस्तांतरीत करण्याविषयी चर्चा झाली. या चर्चेच्या अनुषंगाने दि.०१.०८.२०१७ रोजी संतपीठ हा विषय उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडे हस्तांतरीत करण्यात आला आहे. दरम्यान मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली औरंगाबाद जिल्ह्यातील विविध विकास कामांचे सादरीकरण अंतर्गत संतपीठ, पैठण बाबत दि.०९.०९.२०२१ रोजी बैठक आयोजित केली होती. सदर बैठकीत झालेल्या निर्णयानुसार संतपीठ, पैठण चे शैक्षणिक व्यवस्थापन डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाकडे सोपविण्याबाबतची बाब शासनाच्या विधाराधीन होती.

शासन निर्णय ;-

सदर बैठकीत झालेल्या निर्णयानुसार पैठण संतपीठामध्ये भारतीय परंपरा व संस्कृती, संतसंप्रदाय, संतसाहित्य, किर्तन, प्रवचन, तत्वज्ञान या बाबीशी संबंधित विविध प्रमाणपत्र/पदविका/पदवी/पद्वयुत्तर अभ्यासक्रम चालविण्यासाठी संतपीठाचे शैक्षणिक व्यवस्थापन डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद यांच्याकडे ५ वर्षासाठी, किंवा पुढील आदेश होईपर्यंत यापैकी जे लवकर होईल ते, सोपविण्यात येऊन संतपीठ कार्यान्वित करण्यास खालील अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

१. विविध प्रमाणपत्र/पदविका/पदवी/पद्वयुत्तर अभ्यासक्रमांना आवश्यक त्या प्राधिकारणांकडून मान्यता घेण्यात यावी.
२. निरनिराळ्या संप्रदायाच्या अभ्यासासाठी स्वतंत्र अभ्यास घटकाची निवड करुन अभ्यासक्रमांची निर्मिती करावी.
३. प्रत्येक संप्रदायाच्या अभ्याक्रमांना संतपीठात योग्य ते स्थान देण्यात यावे.
४. सदर संतपीठाकरीता शासन निधीतून कोणतेही नविन पद तयार करता येणार नाही.
५. अभ्यासक्रम चालविण्यासाठी विद्यापीठाने आवश्यकतेनुसार या क्षेत्रातील तज्ञ व्यक्तींची मानधन तत्वावर/तासिका तत्वावर तसेच शिक्षकेत्तर कर्मचारी कंत्राटी स्वरुपात बाह्यस्त्रोतामार्फत उपलब्ध करुन घेऊन याकरिता येणारा आवर्ती खर्च विद्यापीठाने सद्यस्थितीत स्वनिधीतुन उपलब्ध करुन द्यावा.
६. संतपीठ या संस्थेच्या जागेची तसेच इमारतीची मालकी शासनाकडेच राहणार असून, फक्त शैक्षणिक उपक्रम राबविण्याकरीता ही इमारती विद्यापीठास सोपविण्यात येत आहे.
७. इमारतीचा रखरखाव विद्यापीठाने करावा. तसेच अभ्यासक्रम चालविण्यासाठी आवश्यक साहित्य विद्यापीठाने उपलब्ध करुन द्यावे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९१७१४५१४५४५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2021.09.17 14:53:39 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) कुलगुरू, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
३) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
५) सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे/ औरंगाबाद.
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
८) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे/ औरंगाबाद.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/औरंगाबाद.
१०) नियोजन विभाग (१४७१), मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-३)/(व्यय-५) मंत्रालय, मुंबई.
१२) मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१३) मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४)  मा.प्रधान सचिव. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.